# पुढील जन्म कुठे घ्यायचा हे कोण ठरवते ?

## E Book 180

### डार्विनचा उत्क्रांतिवादी सिद्धांत खरा आहे काय ? - १५

**डार्विनचा उत्क्रांतिवादी सिद्धांत खरा आहे काय ? - १५**

प्राचार्य अद्वयानंद गळतगे भ्रः ९९०२००२५८५

भोज-जि. बेळगाव(कर्नाटक)५९१२६३

**१. ब्रह्मदेशातील मा खिन् सान तिन् व मां खिन् सान यिन्**

**या जुळ्या मुलींचे प्रकरण**

मा खिन् सान तिन् व मा खिन् सान यिन् या जुळ्या मुली १७ नोव्हेंबर १९४९ रोजी उत्तर ब्रहादेशातील प्यावब्वे या शहरापासून ३ कि.मी. अंतरावर अंतरावर असलेल्या मिन्लान या खेड्यात जन्मल्या. त्यांच्या वडिलाचे नाव उ चित् ह्त्वे व आईचे नाव दाव खिन् क्यी. उ चिन् ह्त्वे हा व्यवसायाने लोहार होता. या जुळ्या  मुलीना ७ भावंडे होती. पांच त्यांच्याहून मोठी व दोन लहान. मा खिन् सान तिन् ही मा खिन् सान यिन पेक्षा पाच मिनिटांनी मोठी होती. हे जुळे दोन भिन्न बीजापासून जन्मल्याचा तर्क करण्यात आला आहे. तीन वर्षांनी त्या बोलायला शिकल्या. १३ वर्षांच्या झाल्यावर त्यांनी शेजारच्या घरातील दाव सान मै ह्या बाईला सांगितले की त्या मागच्या जन्मी दोघे जपानी सैन्यातील भाऊ होते व ज्या घरात त्यांनी जन्म घेतला त्या घराच्या पश्चिमे कडील जागेत मेले होते. ही गोष्ट आपल्या कुटुंबातील कुणालाही त्यांनी सांगितली नव्हती. मात्र आपल्याला जपानला घेऊन जाण्यास आपल्या कुटुंबियांना त्या  सांगत असत.

त्या शेजारच्या बाईकडूनच त्यांना त्यांच्या मागच्या जन्मात जपानी भाऊ असल्याचे समजले, मात्र तेरा वर्षापर्यंत त्या दोघी आपसांत कोणालाही न समजणाऱ्या भाषेत बोलत असत. ही जपानी भाषा असावी असा यांच्या कुटुंबियांनी साहजिकच तर्क केला, पण त्याची त्यांनी पडताळणी केलेली नाही.

त्या मुलीच्या पुनर्जन्माची ही बातमी जवळच्या खेड्यात राहणा-या उ विन् या पुनर्जन्म संशोधकाला समजली व त्याने १८७६ साली (त्या मुली १७ वर्षाच्या असताना त्यांची मुलाखत घेऊन त्यांनी सांगितलेल्या सर्व गोष्टींची नोंद केली. (पुढे स्टिव्हेन्सननीही यांची मुलाखात घेतली.) त्यांनी उ विन्ला आपल्या मागच्या जन्माविषयी सांगितलेल्या गोष्टी अशा:

त्या मागच्या जन्मी जपानी सैन्यातील भाऊ होत्या. त्यांना इतर भावंडे नव्हती. मग खिन् सान तिन् ही मा खिन् यिन् पेक्षा तीन वर्षांनी मोठा भाऊ होती. दोघांनी सातवी पर्यंत शिक्षण घेतले होते,थोरला भाऊ (मा खिन् सान तिन्) १५ वर्षांचा व धाकटा भाऊ (मा खिन् सान यिन्)) १२ वर्षाचा असताना त्यांचे वडिल वारले. नंतर ते आईबरोबर- जिच्यावर त्यांचे जीवापाड प्रेम होते- राहू लागले. त्यांच्या आईला कसलेही काम न करता जीवन कंठण्याइतकी मिळकत उपलब्ध होती, त्यांचे जपानात दक्षिणेकडे मुख असलेले व पन्हळी पत्र्याचे छप्पर असलेले घर होते. जपानला आपणाला नेले तर मात्र आम्ही आमचे घर दाखवू शकणार नाही असे त्यांनी म्हटले आहे.

१८ वर्षाचा झाल्यावर थोरल्या भावाने जपानी सैन्यात भरती व्हायचे स्वखुषीने ठरविले. धाकटा भाऊ आपल्या थोरल्या भावाला सोडून राहू इच्छित नव्हता. जगायचे तर आपल्या थोरल्या भावाबरोबरच व मरायचे तर थोरल्या भावाबरोबरच असे त्याने ठरविले होते. देशासाठी मरण पत्करणे हे आपले श्रेष्ठ कर्तव्य आहे असे दोघेही मानत होते. शेवटी आपल्या आईच्या इच्छेविरुद्ध दोघेही सैन्यात भरती झाले, एक वर्षपर्यंत त्यांना सैनिकी शिक्षण देण्यात आले. पुढे थोरला भाऊ कॅप्टन झाला व धाकटा भाऊ लान्स कार्पोरल झाला. दुसऱ्या महायुध्दात ब्रह्मदेशातील ब्रिटिशाबरोबरच्या युद्धाच्या वेळी थोरला भाऊ २५ वर्षाचा होता व धाकटा भाऊ २२ वर्षाचा होता. या युध्दात ब्रिटिश सैन्याने प्रथम

मेइक्तिला घेतले व नंतर प्यावब्बे शहरही घेतले. जपानी सैन्याला माघार घ्यावी लागली. १९४५ च्या एप्रिल महिन्यात ब्रिटिश व जपानी सैन्यामधील हे युद्ध चालू असताना दोघेही भाऊ मिन्लान या गावात होते. ५/७ ब्रिटिश विमाने मिन्लानवर जेथे जपानी ट्रक्स वगैरे वाहने होती - बाँब टाकण्यासाठी चालून आली. या वेळी दोघेही भाऊ एका घराच्या पश्चिमेकडे असलेल्या दोन चिंचेच्या झाडांच्या मधल्या भागात स्वसंरक्षणासाठी पळत आले. त्यानी उ विन या पुनर्जन्म संशोधकाला सांगितलेली ही गोष्ट खरी असल्याची, साक्ष नंतर १४ वर्षांनी त्या घराच्या (ज्या घरात मृत्यू  नंतर १४ वर्षांनी त्या दोघा भावांनी जुळ्या मुलींच्या रूपाने  जन्म घेतला ) मालकाने दिली आहे, हा घरमालक म्हणजे उ चित् ह्त्वे या जुळ्या मुलींच्या बापाचा बाप उ चित् ह्त्वे होय. कारण त्याने (उ श्वे  थी ने) त्या दोन जपानी सैनिकांना तलवार, पिस्तूल व ग्रेनेड घेऊन आपल्या घराकडे पळत येत असलेले पाहिले व ते आपल्याला मारण्यासाठीच येत आहेत अशा संशयाने आपल्या घराजवळच्या संरक्षणासाठी खोदलेल्या खंदकात पळत जाऊन लपून बसला. चाल करून आलेली ५/७ ब्रिटिश विमाने बाँब वर्षाव करून गेल्यानंतर तो (उ श्वे थीने) खंदका बाहेर आला तेव्हा त्याला संपूर्ण मिन्लान गाव पेटलेले दिसले. व ते दोन जपानी सैनिक त्या दोन चिंचेच्या झाडांच्या मधल्या भागात मरून पडलेले त्याने पाहिले. त्यांची हत्यारे यांच्या शरीराजवळ पडलेली होती, त्या सैनिकांजवळ जाण्याचे धैर्य त्याला झाले नाही. तो पूर्वेला २ कि.मी. अंतरावर असलेल्या लुन्पोंथा बौध्द मंदिराकडे - ज्या मंदिरात त्याच्या कुटुंबियाना स्वसंरक्षणासाठी पूर्वीच हालविण्यात आले होते - पळून गेला, तीन दिवसांनी त्याचे कुटुंब आपल्या घराकडे परत आले, तेव्हां आपले घर जळून नष्ट झाल्याचे त्यांना आढळले. (नंतर ते पुन्हा बांधण्यात आले.) त्या दोन जपानी सैनिकांची शरीरे जळलेली त्यांना आढळली. यांची हत्यारे मात्र तेथे नव्हती. कोणी तरी ती नेली होती.

उ विन् या पुनर्जन्म संशोधकाला त्या मुलींनी पुढे सांगितले की ते दोघेही दोन जोड चिंचेच्या झाडांच्या मधल्या भागात स्वसंरक्षणासाठी आसरा घेत असताना त्यांच्या जवळील ग्रेनेडचा स्फोट होऊन ते मेले, मृत्यू वेळी त्यांना

आपल्या जपानमधील आईची आठवण झाली व मदतीसाठी त्यांनी तिची प्रार्थना केली. मेल्यानंतर अचानक जपानातील आपल्या आई- जवळ आपण आलो असल्याचे त्या दोघानाही आढळून आले व ते तिच्याशी बोलू लागले. पण तिला ते दिसत नसल्यामुळे व त्यांचे बोलणेही ऐकायला गेले नसल्यामुळे तिने त्यांना कसलाच प्रतिसाद दिला नाही. त्यामुळे त्यांना वैफल्याचा अनुभव आला. नंतरचे मात्र आपल्याला काहीच आठवत नसल्याचे त्यांनी  म्हटले आहे. या खिन सान तिन् व मा खिन सान यिन् या नावांनी जन्म घेतल्या  नंतर तिसऱ्या वर्षात एकदम जपानातील आपल्यास मागच्या जन्माची आपल्याला आठवण झाली असे त्यांनी म्हटले आहे.

**या जुळ्याचा स्वभाव व वर्तणूक**

दोन्ही मुली पुरुषी कपडे वापरण्याचा हट्ट धरत दहाव्या वर्षापर्यंत त्या पुरुषी कपडेच वापरत होत्या. नंतर मा खिन् सान तिन् ही थोरली मुलगी स्त्रियांची कपडे वापरू लावली होती. पण मा खिन् सान यिन् ही धाकटी मुलगी १७व्या वर्षापर्यंत पुरुषी कपडेच (पँटशर्ट) वापरत होती. तेव्हा थोरलीने तिची कान उघाडणी करून स्त्रियांचे कपडे वापरण्यास तिला भाग पाडले. दोघीही ब्रह्मी भाषा बोलायला शिकल्या असल्या तरी धाकटी रागावली असताना अशुध्द ब्रह्मी भाषा बोलत असे, थोरली रागावली असताना आपण पुरुष असल्याची तीव्र जाणीव होत असल्याचे म्हणे, दोघींनाही  ब्रह्मदेशातील परिस्थितीशी व जीवनाशी जुळवून घेणे अतिशय कष्टाचे जात होते. ब्रह्मदेशातील उष्णता त्यांना सहन होत नसे. ब्रह्मी अन्नपदार्थातील मसाल्याच्या पदार्थाच्या वापराबद्दल त्यांची नेहमी तक्रार असे. मसाला घातलेले अन्न त्यांना आवडत नसे.  त्यांना राग अनावर होत असे व ज्यांच्यावर रागावत त्यांना मारण्यासही कमी करत नसत, क्रूरता हे त्यांचे स्वभाव वैशिष्य होते. ब्रिटिशाबद्दल त्यांची वैरत्वाची भावना असल्याचे आढळून आले. उद्योगशीलता, कष्ट करण्याची तयारी हे जपानी लोकात आढळून येणारे गुणही त्यांच्यात होते. थोरलीपेक्षा धाकटीची ब्रह्मी जीवनाबद्दल जास्त तक्रार असे. ती अधिक भांडखोर होती. घरात तिचा दरारा असे, घरातील लोकांवर ती आपला अंमल गाजवत असे. पुढे थोरलीने लग्न केले

व मुलांना जन्म दिला. धाकटी मात्र अविवाहितच राहिली. दोघींचे इतर कुटुंबियापेक्षा परस्पराबद्दल जास्त प्रेम होते, जे थोरलीच्या विवाहानंतरही किंचितही कमी झाले नाही. थोरलीचा नवरा परगावी गेल्यावेळी धाकटी तिची सोबत करीत असे.

**२- <u>माउंग अउंग को थेइ्न व माउंग अउंग चो थेइ्न या जुळ्या मुलांचे प्रकरण</u>**

हे प्रकरण उ विन मांउग या ब्रह्मदेशातील पुनर्जन्म संशोधकाने तपासले आहे, नंतर स्टिव्हेन्सन यांनी त्यात भाग घेतला.

माउंग अउंग को थेइ्न व माउंग अउंग चो थेइ्न ही जुळी मुळे ५ जुलै १९७० रोजी दक्षिण ब्रहादेशातील मौलमेइन या शहरात जन्मली. त्यांच्या वडिलाचे नाव उ ह् ला थेइ्न व आईचे नाव दाव खिन् क्यी. उ ह् ला थेइ्न हा ब्रह्मी असून सरकारी अभियंता म्हणून काम करीत होता. मात्र पत्नी दाव खिन् क्यी ही तीनचतुर्थांश चिनी होती, माउंग अउंग को थेइ्न हा माउंग अउंग चो येइ्न पेक्षा मोठा होता. जन्मतःच दोन जरायू (placenta) आढळून आल्यामुळे ते जुळे दोन भिन्न बीजापासून जन्मल्याचे गृहीत धरण्यात आले होते. दोन्ही मुलांना आपला मागचा जन्म आठवत नव्हता, तथापि थोरला मुलगा (माउंग अउंग को थेइ्न) हा मागच्या जन्मातील भात पिकवणारा सुंदर राम नावाचा (भारतीय) शेतकरी असल्याने व धाकटा मुलगा (माउंग अउंग चो येइ्न) मागच्या जन्मातील भाताच्या गिरणीची मालकीण दाव ह् ला माय् (जिच्या भात गिरणीला सुंदर राम आपला माल विकत असे) असल्याचे त्यांच्या आईवडिलांनी ठरविले होते. त्यांनी असे ठरविण्यास पुढील सबळ कारण होतेः

सुंदर राम मरून पाच महिने उलटल्यानंतर दाव खिन् क्यीला स्वप्न पडले की सुंदर राम आपल्या घरात प्रवेश करीत आहे. तिला त्याची भीती वाटली. कारण हा भारतीयकाळसर वर्णाचा मनुष्य आपल्या पोटी जन्माला येऊ नये असे तिला वाटत होते. (ब्रह्मी लोक सामान्यपणे गोरे असतात.) या स्वप्नाच्या सुमारास ती गरोदर झाली, एक महिन्यानंतर तिला दुसरे स्वप्न पडले. या स्वप्नात तिची मावशी, नवऱ्याबरोबर झोपलेल्या तिच्या बिछान्यात उडी मारून शिरली.

नंतर दाव खिन् क्यीच्या गरोदरपणाची क्ष किरणांनी तपासणी केली असता ओटीपोटात जुळे असल्याचे आढळून आले. इतर देशापेक्षा ब्रह्मदेशात स्वप्न हे पुनर्जन्म ठरवणारे मुख्य साधन असल्याचे अधिक प्रमाणात आढळून येते. म्हणजे ब्रह्मदेशात स्वप्नेच जास्त प्रमाणात पुनर्जन्म ठरवतात, त्यामुळे ही दोन्ही स्वप्ने नंतर खरी ठरल्याची आढळून आली. माउंग अउंग को येइ्न हो मुलगा मागच्या जन्मातील सुंदर राम हा असल्याचा भौतिक (शारीरिक) पुरावाही जन्मानंतर मिळाला. तो पुरावा म्हणजे सुंदर रामच्या कानाच्या वरच्या पाळीला भिकबाळी घालण्यासाठीचे भोक होते. (भारतीयामध्ये भिकबाळी घालण्याची प्रथा आहे. सुंदर राम पूर्वी भिकबाळी घालत असावा.) माउंग अउंग को थेइ्नच्या कानाच्या वरच्या पाळीलाही जन्मतःच तशीच भिकबाळीच्या भोकाची खूण आढळून आली,

माउंग अउंग को थेइ्न हा मुलगा मागच्या जन्मात दाव ह् ला माय् (स्त्री) असल्याबद्दलचे सत्य सिद्ध करणारा पुरावा तिचा पुरुषात झालेल लिंगबदल मानता येईल. कारण दाव ह् ला माय् हिने आपल्या भाचीला, म्हणजे दाव खिन् क्यीला (जिच्या पोटी मृत्यूनंतर तिने पुरुष रुपाने जन्म घेतला) मृत्यूपूर्वी म्हटले होते, "मला स्त्रीजन्माचा वीट आला आहे. पुढील जन्म मला पुरुष रूपात मिळावा अशी माझी इच्छा आहे?" स्त्रियांना पुरुषांची देखभाल करावी लागते ही तिची स्त्रीजीवना- बद्दलची आपली तक्रार असल्याचे तिने म्हटले आहे. तिची पुरुष रूपात जन्म घेण्याची इच्छा सफल झाल्यामुळे माउंग अउंग चो थाइ्न हा मागच्या जन्मात दाव ह् ला माय्  असल्याचे सिद्ध करणारा स्वप्ना खेरीजचा हा एक जास्तीचा पुरावा ठरतो. अशारीतीने प्रस्तुत जुळ्या मुलांना आपला मागचा जन्म आठवत नसला तरी त्यांच्या आईवडिलांनी ती जुळी मुले मागच्या जन्मात कोण होती हे स्वप्नामुळे बरोबर ओळखले होते.

**दाव ह् ला माय्चे जीवन  व मृत्यू**

दाव ह् ला माय् ही १९०९ च्या सुमारास ब्रह्मदेशातील बलुग्यून बेटात जन्मली. तिचे आईवडिल (दाव थी व उ सैंग ह् पू) चीनी होते, त्यांचा भाताच्या गिरणीचा धंदा होता. ही गिरणी क्वांथे नामक ठिकाणी होती. दाव ह् ला माय्

हिचा सुंदर रामशी आपल्या गिरणीसाठी त्याचा भात विकत घेण्यामुळे घनिष्टसंबंध निर्माण झाला होता. सुंदर राम स्वतःच्या शेतातील भाताबरोबरच इतर शेतकऱ्यांचा भातही दाव ह् ला माय्च्या गिरणीसाठी बैलगाडीतून आणून विकत असे. ह्या भागात ती एकमेव गिरणी असल्यामुळे दाव ह् ला माय्चे कुटुंब अत्यंत श्रीमंत व सामर्थ्यवान बनले होते. दाव खिन् क्यी ही दाव ह् ला मायची भाची होती. या कौटुंबिक नात्याशिवाय दाव खिन् क्यीचा आपल्या मावशीशी अत्यंत जिव्हाळ्याचा प्रेमसंबंध होता, त्यामुळे जेव्हा दाव ह् ला माय मधुमेह व रक्तदाब या व्याधीमुळे आजारी पडली तेव्हां दाव खिन् क्यी तिची भाची भात गिरणी  चालवू  लागली. पुढे दाव ह् ला मायचा आजार बळावला व तिला मौलमेइन शहरात हालवण्यात आले. तेथे १९५८च्या  सुमारास दान खिन क्यीच्या मांडीवर तिने (दाव ह् ला मायने) आपला प्राण सोडला.  या वेळी तिचे वय ४९च्या आसपास होते.

<u>सुंदर रामचे जीवन व मृत्यू</u>

सुंदर राम हा भारतीय १९१९च्या सुमारास जन्मला. तो ब्रह्मदेशाच्या बलुग्यून बेटातील नातिन्हाव या खेड्यात राहत होता. हे खेडे क्वांथे या भात गिरणीच्या ठिकाणापासून दक्षिणेला ५ कि. मी. अंतरावर होते. क्वांथेमधील भात गिरणी चालवणारी दाव ह् ला माय् ही क्वांथेपासून दक्षिणेला ३ कि.मी. अंतरावर असलेल्या ह् या यांग्यी गोने या खेड्यात राहत होती. अशा रीतीने दान ह् ला माय हिचे गाव व सुंदर रामचे गाव यात फक्त २.कि. मी. चे अंतर होते सुंदर रामचा दान ह् ला माय्शी भात विक्रीमुळे जसा घनिष्ठ संबंध आला, तसाच दाव ह् ला मायच्या आजाराच्या अवधीत तिची भात गिरणी चालवणाऱ्या दाव खिन् क्यी ह्या तिच्या भाचीशीही त्याचा भात विक्रीमुळे घनिष्ठ संबंध आला होता.

इ.स. १९६९ च्या प्रारंभी दाव खिन् क्यीचे उ ह् ला थेईन शी लग्न झाले व ते जोडपे रंगूनमध्ये राहू लागले. त्यानंतर थोड्याच दिवसात सुंदर राम आजारी पडला असल्याचे त्यांना समजले, सुंदर राम काम करू शकत नसल्यामुळे त्याची आर्थिक स्थिती खालावली होती. त्यांनी (दाव खिन् क्यी व तिचा नवरा यांनी) त्याला अन्न पाठविण्याची व्यवस्था केली. सुंदर राम में १९६९ मध्ये ५० व्या वय

वर्षी  बलुग्यूनमध्ये वारला. दाव खिन् क्यी म्हणते की सुंदर राम अत्यंत शांत स्वभावाचा, प्रामाणिक, कष्टाळू माणूस होता, सुंदर रामच्या मृत्यूनंतर ५ महिन्यांनी त्याने दाव खिन् क्यीच्या घरात प्रवेश केल्याचे तिला स्वप्न पडल्याच्या वर उल्लेख आलाच आहे. नंतर एक महिन्याने आपली मावशी दाव ह् ला माय हिने नवऱ्याबरोबर झोपलेल्या दाव खिन् क्यीच्या बिछान्यात उडी मारून शिरल्याचे तिला दुसरे स्वप्न पडल्याचाही त्याच ठिकाणी सांगितले आहे. अशा रीतीने सुंदर राम व दाव ह् ला माय ही तिची मावशी दाव खिन् क्यीच्या स्वप्नात सांकेतिकपणे तिला पूर्वसूचना देऊन तिच्या पोटी अनुक्रमे माउंग अउंग को थेइ्न व माउंग अउंग चो थेइ्न या जुळ्या मुलग्यांच्या रूपाने जन्मले. त्यांचा एकमेकाशी  दाव खिन् क्यीशी निर्माण आलेला घनिष्ठ पूर्वसंबंध त्यांनी तिच्या पोटी जन्म घेण्यास कारणीभूत असल्याचे येथे दिसते.

प्रस्तुत जुळ्याच्या वर्तणुकीतील फरक

(१) माउंग अउंग को थेइ्न हा काळ्या वर्णाचा होता / सुंदर राम काळसर होता. माउंग अउंग चो थेइ्न गोरा होता / दाव ह् ला माय गोरी होती. (२) माउंग अउंग को थेइ्नच्या कानाच्या वरच्या पाळीला भिकबाळीच्या

भोकाची जन्मखूण होती / सुंदर रामच्या कानाच्या वरच्या पाळीला भिकबाळीची खूण  होती (भोक होते.)  माउंग अउंग चो थेइ्नच्या कानाच्या वरच्या पाळीला जन्मखूण नव्हती / दाव ह् ला मायच्या कानच्या वरच्या पाळीलाही खूण नव्हती. ती कानात कर्णफुले घालत होती,

(३) माउंग अउंग को थेइ्न पुरुषी कपडे घाली. / सुंदर राम पुरुष होता. माउंग अउंग चो थेइ्न मुलीचे कपडे, कर्णफुले व बांगड्या घाली / दाव हला माय स्त्री होती न कर्णफुले, बांगड्या घालत होती.

(४) माउंग अउंग को थेइ्न  मितव्ययी होता. / सुंदर राम गरीब शेतकरी होता. माउंग अउंग चो थेइ्न खर्चिक होता / दांव हला माय् श्रीमंत होती.

(५) माउंग अउंग को थेइ्न  शांत खभावाचा तर सुंदर राम खालच्या (शेतकरी) वर्गातला व शांत स्वभावाचा, मितभाषी होता.  माउंग अउंग चो थेइ्न

दुसऱ्यावर वर्चस्व गाजवणारा व बोलघेवडा होता. दाव ह् ला माय उच्च वर्गातली, बोलघेवडी स्त्री होती.

(६) माउंग अउंग को थेइ्न साध्या अन्नावर समाधानी असे/ सुंदर रामचे अन्न साधे होते, माउंग अउंग चो थेइ्न विशिष्ट अन्नाचा हट्ट धरी। दाव ह् ला माय अन्नाबाबत अतिशय चोखंदळ होती.

(७) माउंग अउंग को थेइ्नला कढी आवडे. तो डुकराचे मांस खात नसे. सुंदर राम भारतीय होता. (भारतीयांना कढ़ी आवडते) डुकराचे मांस ते खात नाहीत.

माउंग अउंग चो थेइ्नला कढी आवडत नव्हती. त्याला डुकराचे मांस आवडत होते / दाव ह् ला माय लाही डुकराचे मांस आवडत होते. येथे दोन परस्परविरुध्द वर्तणुकीच्या व भिन्न सामाजिक वर्गातील व भिन्न राष्ट्रीय व्यक्ती केवळ व्यावसायिक (भात गिरणीला भात विकण्याच्या) संबंधामुळे एकत्र जुळ्या मुलांच्या रूपाने जन्म घेतलेल्या दिसतात, तसेच जिच्या पोटी त्यांनी जन्म घेतला होता त्या व्यक्तीशीही त्यांचा (एकाचा-सुंदर रामचा) व्यावसायिक व दुसऱ्याचा दाव ह् ला मायचा) नात्यातील प्रेमाचा पूर्व संबंध असल्याचेही येथे दिसते. पण तिच्या (दाव खिन क्यीच्या) पोटी जन्म घेण्यास सुंदर रामला केवळ १४ महिने वाट पाहावी लागली व दाव ह् ला मायला मात्र १२ वर्षे वाट पाहावी लागली. असे येथे दिसते.

## पुढील जन्म कुठे घ्यायचा हे कोण ठरवते ?

वरील विधानातील (दाव खिन् क्यीच्या पोटी जन्म घेण्यासाठी) 'वाट पाहावी लागली' या शब्दप्रयोगावरून पुढील जन्म कुठे (कुणाच्या पोटी) व्यावयाचा हे ठरविण्याचे स्वातंत्र्य विशिष्ट व्यक्तीच्या पोटी जन्म घेण्यासाठी 'वाट पाहणाऱ्या' व्यक्तीला आहे असे ठरते. उदा. ब्रह्मदेशात ज्या स्त्रीच्या पोटी जन्म घ्यावयाचा तिच्या स्वप्नात जन्म घेणारी व्यक्ती (वरील जुळ्याप्रमाणे) येते किंवा तिच्या पोटी जन्म घेणार असल्याचे स्वप्नात भेटून सांगते. उदाहरणार्थ मा खिन् मार हुतू (प्रकरण ११), मा म्यिंत थेइन (प्रकरण १०), काही जण जिच्या

पोटी जन्म घ्यावयाचे तिला आपल्या मरणापूर्वीच सांगतात की मी तुझ्या पोटी पुढील जन्म घेणार आहे! उदा. किर्पा देनी, कोर्लिस चोटकिन् (प्रकरण ९), रत्राण हामी (प्रकरण १२) एखाद्या व्यक्तीला कुठे जन्म घ्याव्याचे हे ठरविण्याचे स्वातंत्र्य असल्याचे दर्शविणारी अशी प्रकरणे तुरळक आढळून येतात. बहुसंख्य प्रकरणात पुढील जन्म कुठे घ्यावयाचे हे ठरविण्याचे स्वातंत्र्य नसल्याचे दिसते. हे स्वातंत्र्य अर्थात् कर्माध्यक्ष ईश्वराचे आहे. जेथे हे स्वातंत्र्य एखाद्या व्यक्तीला असल्याचे दिसते ते सुध्दा तिच्यातील ईश्वराचेच ते स्वातंत्र्य असून ते अतींद्रिय शक्तीच्या स्वरूपात प्रकट झालेले असते, इतकेच. प्रत्येक व्यक्तीत अतीद्रिय (ईश्वरीय) शक्ती सुप्त स्वरुपात अस्तित्वात असते. काही व्यक्तीत ती प्रसंगोपात्त प्रकट होते, इतकेच. वरील व्यक्तीत ती प्रसंगोपात्त प्रकट झालेली दिसते आहे. (Reincarnation and Biology-Ian Stevenson)